**महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांक- मातंसं-१७१७/प्र.क्र. १११ /३९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
दिनांक - २७ मार्च, २०१७

वाचा:- शासन निर्णय सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग समक्रमांक्र दि. २४/३/२०१७

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळामार्फत माहिती तंत्रज्ञानशी संबंधित तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करण्यासंदर्भात सूचना निर्गमित केल्या आहेत व त्यासोबतच्या परिशिष्टान्वये दिनांक १/४/२०१७ ते ३१/३/२०१८ या कालावधीकरिता तांत्रिक मनुष्यबळाचे दर (करा व्यतिरिक्त) विहित केले असल्याचे शासन निर्णयातील परिच्छेद क्र ३ मध्ये नमूद केले आहे. यासंदर्भात एक वर्षापेक्षा अधिक कालावधी पलिकडे सुरु राहणाऱ्या प्रकल्पांसाठी महामंडळामार्फत तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात येईल किंवा कसे याबाबत काही मंत्रालयीन विभागांकडून विचारणा करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने अधिक खुलासा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन पुरकपत्र:-**

संदर्भाधिन शासन निर्णय क्र. मातंसं-१७१७/प्र.क्र. १११ /३९, दिनांक २४ मार्च,२०१७ मधील परिच्छेद क्र.३ मध्ये विहित केल्यानुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या तांत्रिक मनुष्यबळाच्या कालावधीबाबत कोणतीही कमाल मर्यादा राहणार नाही. मात्र महामंडळाकडून तांत्रिक मनुष्यबळाकरीता निश्चित केलेले दर त्या त्या वर्षासाठी लागू राहतील. दि. २४ मार्च,२०१७ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात विहित केलेले दर दि. १ मार्च,२०१७ ते दि. ३१ मार्च,२०१८ या कालावधीसाठी लागू राहतील. त्यानंतर प्रत्येक आर्थिक वर्ष सुरू होण्याच्या आधी त्या त्या आर्थिक वर्षाकरीता तांत्रिक मनुष्यबळाचे सुधारीत दर महामंडळाकडून जाहिर करण्यात येतील.

२.  सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३२७१७१८५४३७११ असा आहे. हे पुरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Kumar Gautam

Digitally signed by Vijay Kumar Gautam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DIT DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=311cc440015e13fc8ca96250c4963fa20b825 48e03a2e70608c928dde34acd2b, cn=Vijay Kumar Gautam
Date: 2017.03.27 17:26:38 +05'30'

**( विजय कुमार गौतम )**
प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान

**प्रत**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (माहिती तंत्रज्ञान) यांचे खाजगी सचिव
५) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
६) सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८) अपर मुख्य सचिव( वित्त ), वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई-३२,
९) प्रधान सचिव (उद्योग ), उद्योग,उर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई-३२
१०) सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/विशेष सचिव/सचिव,
११)* प्रधान सचिव , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१२) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
१३) सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१४)* प्रबंधक , मुळ शाखा, मुंबई उच्च न्यायालय , मुंबई
१५)* प्रबंधक , अपील शाखा, मुंबई उच्च न्यायालय , मुंबई
१६)* प्रबंधक , लोक आयुक्त व उपलोक आयुक्त , महाराष्ट्र राज्य , मुंबई
१७)* सचिव , महाराष्ट्र लोकसेवा आयोग , मुंबई
१८) सर्व मंत्रालयीन विभाग
यांना विनंती करण्यात येते की, सदरहु शासन निर्णय त्यांच्या अधिनस्त सर्व क्षेत्रिय कार्यालये , सार्वजनिक उपक्रमे, महामंडळे, केंद्रशासनाने अथवा राज्य शासनाने पारित केलेल्या अधिनियमानुसार स्थापित कंपन्या व संस्था यांच्या निदर्शनास आणण्यात यावा.
१९) वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-३२,
२०) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२१) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
२२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य,

२३) महालेखापाल १/२ लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२४) महालेखापाल १/२ लेखा परिक्षा महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२५) महालेखापाल , (वाणिज्यिक लेखा), महाराष्ट्र, मुंबई
२६) व्यवस्थापकीय संचालक , महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, मंत्रालय, मुंबई-३२.
२७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२९) सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व क्षेत्रीय कार्यालये/सर्व महामंडळे
३०) सर्व महानगरपालिका/नगरपरिषदा/जिल्हा परिषदा
३१) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
३२) निवड नस्ती